**मिशन महासंचालक, मनरेगा यांच्या कार्यालयाची कार्यपद्धती, अधिकार व जबाबदाऱ्या.**

**महाराष्ट्र शासन**
**नियोजन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: मग्रारो-२०२३/प्र.क्र.१९/रोहयो-७**

१६ वा मजला, नवीन प्रशासन भवन,
मादाम कामा रोड, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दिनांक :- ०३ मे, २०२३.

**वाचा :**

१) महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी कायदा - २००५,
२) महाराष्ट्र रोजगार हमी अधिनियम (सुधारित) कायदा - २०१४,
३) शासन निर्णय क्र. मग्रारोहयो -२०२०/ प्र. क्र.२१ /रोहयो-७, दि. ०५ ऑगस्ट, २०२०.
४) शासन निर्णय क्र. मग्रारोहयो -२०२०/ प्र. क्र.२१ /रोहयो-७, दि.०२ सप्टेंबर, २०२०.
५) शासन निर्णय क्र. मग्रारोहयो -२०२२/प्र.क्र.१७४/रोहयो-६अ, दि.१४ डिसेंबर, २०२२
६) शासन निर्णय क्र. मग्रारोहयो -२०२२/प्र.क्र.१७४/रोहयो-६अ, दि.०३ जानेवारी, २०२३
७) मग्रारोहयो राज्य निधी असोसिएशन २७ व्या कार्यकारी समितीच्या बैठकीचे इतिवृत्त दि.११ एप्रिल, २०२३
८) शासन निर्णय क्र. मग्रारो-२०२३/प्र.क्र.१९/रोहयो-७, दि.१८ एप्रिल, २०२३

**प्रस्तावना :-**

२. मा. मंत्रीमंडळ बैठक क्र.१९ दि. १३/१२/२०२२ रोजीच्या बैठकीत मनरेगा व विविध विभागांच्या योजनांच्या अभिसरणातून सुविधा संपन्न कुटुंब मिशन व सर्वांगीण ग्राम समृद्धी योजनेस राज्य योजना म्हणून राबविण्यास मान्यता देण्यात आलेली आहे. तसेच राज्याचा रोहयो कायदा २०१४ च्या तरतुदीनुसार मनरेगा योजनेची मिशन मोडवर प्रभावी अंमलबजावणी करण्यासाठी मिशन कार्यालय स्थापन करण्यासाठी मा. मंत्रीमंडळाच्या बैठकीत मान्यता देण्यात आलेली आहे. त्या अनुषंगाने संदर्भीय क्रमांक ९ नुसार मिशन महासंचालक, **मनरेगा** या पदावर भारतीय प्रशासन सेवेतील सेवानिवृत्त अधिकाऱ्याची सेवा उपलब्ध करून देण्याबाबत निर्णय घेण्यात आला आहे.

३. या **मिशनला** प्रामुख्याने खालीलप्रमाणे कामे करावे लागतील:-

१.नैसर्गिक संसाधन व्यवस्थापन (Natural Resource Management)-

१.१. पाण्याचा योग्य (Optimum) वापर-Per Drop More Money- PDMM

१.२. मृदाचा योग्य (Optimum) वापर-Per Particle More Money - PPMM मातीचे पोत राखणे, सेंद्रिय कर्ब वाढवणे

१.३. या उद्दीष्टांकरिता शेती व निगडीत व्यवसायांच्या उत्पादकतेत वाढीसाठी क्षमता बांधणी

२. वंचितता निर्मूलन-

२.१. कुटुंबनिहाय नियोजन व मत्ता निर्मिती

२.२. मत्तातून उत्पन्न मिळवण्याच्या उद्दिष्टाने कुटुंबांचे क्षमता बांधणी

३. उत्पादक मत्ता निर्माण होऊन त्यातून उत्पन्न मिळण्यास सुरु होईपर्यंत वंचित कुटुंबाच्या उत्पन्नाचा साधन म्हणून रोजगार देणे.

४. वैयक्तिक उत्पादक मत्तातून योग्य (Optimum) उत्पन्न मिळवता यावे करिता ग्रामीण भागातील पायाभूत सुविधा मजबूत करणे. सोबतच समृद्ध जीवन जगण्यासाठी प्रत्येक गावास सुविधायुक्त करुन सर्वांगीण ग्राम समृद्धी करणे.

५. मनरेगा निधी व सद्य स्थितीत विविध १७ विभागांसोबत समन्वय. यात उमेदचा महिला गटांचा समावेश आहे.

६. NRM (Natural Resource Management) केल्याने **'हर खेत को पानी'** हा विचार सुद्धा राबवणे शक्य होईल.

७. NRM करुन **'हर खेत को पानी' केल्याने पिण्याचे पाण्याचा प्रश्न आपसूक हाताळले जाणार.** त्यामुळे हा मिशन एका अर्थाने **'जल मिशन'** सुद्धा होणार आहे. GSDA च्या नियोजनानुसार

६.१. अटळ भूजल योजनेंतर्गत साधारण १,४४४ गावे

६.२. दुसऱ्या टप्प्यात ३५,००० गावांमध्ये कार्य करण्याचे GSDA चा नियोजन आहे.

८. राज्यात खालील योजना NRM करताना दिसत आहेत.

८.१. अटल भूजल योजना (१,४४४ गावे)

८.२. प्रधानमंत्री कृषि सिंचाई योजना (PMKSY) २.० (१६२० गावे)

८.३. जलयुक्त शिवार २.० (साधारण ५,००० गावे)

८.४. जलशक्ती अभियान (JSA) § CTR

(Catch The Rains, When It Fall, Where It Falls)

८.५. अमृत सरोवर

८.६. पोकरा (Project on Climate Resistant Agriculture)

उपरोक्त, सर्व बाबींच्या विचार करून सुविधा संपन्न कुटुंब मिशन आणि सर्वांगीण ग्राम समृद्धी योजना राज्यात प्रभावी राबवण्यासाठी मिशन महासंचालक, मनरेगा कार्यालयाची कार्यपद्धती व कर्तव्य, जबाबदारी निश्चित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

मनरेगांतर्गत २६४ मंजूर कामांमधून सुविधा संपन्न कुटुंब मिशन व सर्वांगीण ग्राम समृद्धी योजनेची उद्दीष्टे साध्य करणे अपेक्षित आहेत. या सर्व उद्दीष्टांवर समर्पक विचार करून कार्यक्रम आखून त्याची अंमलबजावणीसाठी एक सक्षम यंत्रणेची नितांत गरज आहे. हा SSK-SGY मिशन ती गरज भरून काढेल. तसेच, या मिशन कार्यालयाची कार्यवाही मिशन प्रमुख म्हणून मिशन महासंचालक, मनरेगा यांच्या अधिपत्याखाली करण्यात यावी.

संदर्भीय क्र. ६ येथील शासन निर्णय प्रशासकीय कारणास्तव अधिक्रमीत करण्यात येत आहे.

**उद्दिष्टे:** मिशन कार्यालयाचे उद्दिष्टे खालील प्रमाणे ठेवण्यात येत आहेत.

१. NRM (Natural Resource Management) - 'JSA - CTR', **'हर खेत को पानी',** एका अर्थाने **'मृदा व जल संधारण मिशन स्वरूपात राबविणे'.**

२. बहुआयामी दारिद्र्य निर्देशांकानुसार (MPI) वंचितता निर्मूलन करत सुविधा संपन्न कुटुंबे तयार करणे

३. सर्वांगीण ग्राम समृद्धी

४. शाश्वत विकास ध्येये साध्य करणे.

हे सर्व उद्दिष्ट साध्य करण्यासाठी

I. **मिशन स्तरावर खालील बाबींवर कार्यवाही करावी :**

१. मनरेगाच्या अंमलबजावणीत येणारे अडथळे सतत दूर करत राहणे.

२. राज्यात NRM आणि त्याच्याशी निगडीत येणाऱ्या योजनांचे बारकावे समजून घेऊन त्या प्रत्येक योजनांसाठी मनरेगाचे निधी वापरण्याचे मार्ग मोकळा करणे.

३. NRM च्या संकल्पनेतून 'माथा ते पायथा', 'हर खेत को पानी', 'JSA - CTR', PMKVY २.०, जलयुक्त शिवार अभियान राबवणे

४. NRM च्या संकल्पनेतून सुविधासम्पन्न कुटुंब तसेच सर्वांगीण ग्राम समृद्धी करणे.

५. वरील सर्व कार्य करीत असताना मनरेगांतर्गत भारत सरकार कडून वेळेत निधी प्राप्त करून घेणे.

६. हे सर्व साध्य करण्यासाठी राज्याच्या विविध विभागांसोबत समन्वय साधणे.

७. मनरेगाचे सुधारित दृष्टिकोण राबवून गरीबीचे बहुआयामांवर मात करून

७.१. कुटुंबातील, विशेष करून मुलांचे व महिलांचे कुपोषण दूर करणे.
७.२. मुलांचे शिकण्यातील अडथळे दूर करणे.
७.३. राज्यातील वंचित कुटुंबांचे राहणीमान सुधारणे.

८. वरील प्रकारे अंमलबजावणी करून उद्दिष्ट साध्य होत आहेत यासाठी सातत्यपूर्ण मूल्यांकन करणे. मूल्यांकनाचे घटक ठरवणे जेणेकरुन कुटुंब पातळी ते गाव पातळीपासून राज्य पातळी या सर्व पातळीवर उद्दिष्ट साध्य झाल्याचे लक्षात येईल.

९. राज्यातील पाण्याचे प्रश्न सोडवण्यासाठी सृजनात्मक दृष्टिकोण तयार करणे. राज्यातील विविध भागांचे पर्जन्यमानानुसार मनरेगांतर्गत योजना आखणे.

१०. राज्यात क्षेत्रीय भेटी करुन मनरेगासह विविध विभागातील अधिकारी व कर्मचाऱ्यांचा आढावा सभा घेणे.

११. शासन, पंचायती राज व्यवस्था, नागरी समाज, बचत गट तसेच लाभार्थ्यी यांच्या क्षमता बांधणीची गरज ओळखून यासाठी विशेषकरुन तयार करण्यात आलेले क्षमता बांधणी कक्ष मार्फत व गरजेनुसार बाह्यस्थ संस्था, समाज सेवी संस्थेमार्फत क्षमता बांधणी करणे. आवश्यकतेनुसार व्हिडिओ तयार करुन घेणे तसेच त्याच्या वापरातून मोठ्याप्रमाणावर प्रशिक्षण होण्याच्या दृष्टीने Learning Management System तयार करणे.

१२. राज्यात मनरेगा तसेच अभिसरणातून कामांचे योग्य अंमलबजावणी करणे. त्याचे संनियंत्रणाची व्यवस्थापन करणे आणि आवश्यकतेनुसार माहिती तंत्रज्ञान व्यवस्था तयार करणे.

१३. मिशन हे मनरेगाच्या प्रभावी अंमलबजावणीसाठी ध्येय धोरणे आणि क्षेत्रीय स्तरावर धोरणे विकसित करण्यासाठी जबाबदार घटक यांचे प्रशिक्षण घेणे. यामध्ये शेतकऱ्यांचे उत्पन्न वाढविण्यासाठीची प्राधान्य क्षेत्रे ओळखणे आणि गरिबी निर्मूलन आणि ग्रामीण विकासासाठी लक्ष्य निश्चित करणे समाविष्ट आहे. त्यासाठी निर्माण करण्यात आलेल्या क्षमताबांधणी कक्षाची त्यांना पूर्ण सहकार्य असेल.

१४. मनरेगाच्या अंमलबजावणीचे परीक्षण आणि मूल्यमापन करण्यासाठी मिशन काम करेल यामध्ये डेटा गोळा करणे, कार्यप्रदर्शनाचे विश्लेषण करणे, अडथळे ओळखणे आणि सुधारणेसाठी अभिप्राय देणे यांचा समावेश असेल.

१५. मिशन राज्य सरकार, जिल्हा प्रशासन, स्वयंसेवी संस्था आणि नागरी समाज संस्थांसह (Civil Society Organisation) अशा योजनेशी संबंधित विविध भागधारकांसह जवळून काम करण्यासाठी प्लॅटफॉर्म तयार करेल , जेणेकरून MGNREGA ची अंमलबजावणी सहयोगी आणि प्रभावीपणे केली जाईल.

१६. मिशन महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजनेमधून शाळांचे सुशोभीकरण (संरक्षक भिंत, खेळाचे मैदान, वृक्ष लागवड, परसबाग,किचन शेड, स्वच्छता गृह , शाळा खोल्यांची दुरुस्ती इ.) अंगणवाडी सुशोभीकरण (संरक्षक भिंत, खेळाचे मैदान, वृक्ष लागवड, परसबाग,किचन शेड, स्वच्छता गृह , इ.) व नवी अंगणवाडी बांधकाम करता येईल याकरिता मिशन मोड वर कार्य हाती घेता येईल ज्यामुळे शालापूर्व व शालेय शिक्षणाच्या पायाभूत सुविध पुरवून शिकण्यायोग्य स्थिति निर्माण करता येईल.

**II. SSK व SGS मिशन च्या प्रभावीपणे अमलबजावणी करण्यासाठी राज्यस्तरीय समिती :-**

सदर समितीची कार्यकक्ष खालीलप्रमाणे:-

१. मिशन महासंचालक, मनरेगा मंत्रालय, मुंबई यांचे अंतर्गत राबविण्यात येणाऱ्या कार्यक्रमांना गती देण्याकरीता सतत आढावा घेणे.

२. योजना राबविताना येणाऱ्या अडचणी व अडथळ्यांवर मात करण्यासाठी शासन पातळीवर आवश्यक निर्णय घेणे.

समितीची रचना खालील प्रमाणे आहे :-

१. मा.मंत्री (रोहयो) - अध्यक्ष
२. आयुक्त, नरेगा, नागपूर - सदस्य
३. उप सचिव (रोहयो) - सदस्य
४. राज्य, गुणनियंत्रक अधिकारी - सदस्य
५. उप/सहाय्यक संचालक (लेखा) (रोहयो) - सदस्य
६. महासंचालक, मिशन / अपर मुख्य सचिव /प्रधान सचिव/ सचिव रोहयो - सदस्य सचिव
७. तज्ञ निमंत्रीत सदस्य

सदर समिती आवश्यकतेनुसार बैठक आयोजित करून राज्यस्तरीय मिशन गतीमानतेकरीता निर्णय घेईल.

**III मिशन महासंचालक, मनरेगा यांचे कालावधी, अधिकार व जबाबदारी:**

१. मिशन महासंचालक यांचा कालावधी पाच वर्षाचा राहील त्यानंतर शासनाच्या मान्यतेने प्रत्येक वेळी एक वर्षाने वाढविता येईल.
२. सुविधा संपन्न कुटुंब मिशन राबविण्याकरीता रोहयो योजनेतील कामांमधून परिणाम साध्य करण्यासाठी आंतर-विभागीय अभिसरणातून शेवटच्या टप्प्यापर्यंत प्रभावी अंमलबजावणीसाठी ठोस पावले उचलेल. जेणेकरून योजने मध्ये सामंजस्य आणि सर्वसमावेशकता येईल, गुणवत्तापूर्ण उत्पादक मत्ता निर्माण होईल आणि उत्पादकता सुधारेल यामुळे **गरिबीच्या बहुविध आयामांवर** शाश्वत रीतीने मात करता येईल.
३. मिशन महासंचालक यांचे कार्यालयीन वापरासाठी जागा भाडयाने घेणे व कार्यालयीन खर्चास मान्यता देणे.
४. सुविधा संपन्न कुटुंबांचे उदिष्ट साध्य करण्याकरीता उद्दिष्ट साध्य करण्याकरिता वेगवेगळ्या विभागांच्या कार्यक्रमात काही धोरणात्मक बदल करावयाचे असल्यास, त्याबाबतचा प्रस्ताव रोजगार हमी योजना विभागामार्फत संबंधित विभागास सादर करणे.
५. जिल्हा व तालुका स्तरावरील सुविधा संपन्न कुटुंब मिशन हा कार्यक्रम राबविण्या करीता क्षेत्रीय यंत्रणांच्या कामकाजाची कार्यप्रणाली निश्चित करणे, मार्गदर्शन करणे.
६. मिशन महासंचालक या कार्यालयकरीता पदे भरण्याबाबतचा प्रस्ताव रोजगार हमी योजना विभागास सादर करणे. मिशन महासंचालक कार्यालयाकरिता प्रतिनियुक्तीने शासकीय/ निमशासकीय (जिल्हा परिषद, नगर परिषद इ.) सेवेतील अधिकारी, कर्मचारी उपलब्ध न झाल्यास, सदरची पदे निवृत्त शासकीय/ निमशासकीय अधिका-यांना नियुक्त करून अथवा कंत्राटी पध्दतीने भरणे व आवश्यकतेनुसार पुढील कालावधी वाढविणे आणि त्यांना द्यावयाचे मानधनाचे दर शासनाच्या मान्यतेने निश्चित करणे.
७. मिशन महासंचालक यांच्याकरिता १ आणि कार्यालयात काम करणा-या अधिकारी/ कर्मचारी वर्गाच्या कार्यालयीन वापराकरिता १ अशी २ वाहने भाड्याने घेणे.
८. मनरेगाच्या माध्यमातून मानव विकास निर्देशांकाशी निगडीत सर्व प्रकारच्या केंद्र व राज्य शासनाच्या कार्यक्रमांची अंमलबजावणी आकांक्षित जिल्ह्यात/ तालुक्यात प्राथम्याने करणे व अशा प्रकारची अंमलबजावणी केली जात नसेल तर संबंधित विभागास निर्देश देणे.

९. मिशन महासंचालक यांचे करिता सर्व प्रकारची यंत्रसामुग्री फर्निचर, लेखनसाहित्य मंजूर करण्याचे आणि त्यावर येणारा खर्च मिशनला उपलब्ध होणा-या आस्थापना निधीतून करण्याचे संपूर्ण अधिकार मिशन महासंचालक, मनरेगा यांना राहतील. अशा होणाऱ्या खर्चाबाबतचा प्रस्ताव रोजगार हमी योजना विभागास सादर करावा. विभागाने केंद्रशासनाकडून उपलब्ध करून दिलेल्या ६% प्रशासकीय खर्चातून अथवा राज्य शासनाकडे उपलब्ध असलेल्या प्रशासकीय खर्चातून निधी मिशन महासंचालक यांचे कार्यालय करीत उपलब्ध करून द्यावा.

१०. मिशन महासंचालक याच्या कामकाजास गती देण्याच्या दृष्टीने मिशन महासंचालक आपले काही अधिकार निम्नस्तरीय अधिका-यांना प्रत्यायोजन (Delegate) करू शकतील.

११. सुविधा संपन्न कुटुंब मिशन अंतर्गत राबविण्यात आलेल्या योजनांमध्ये झालेल्या फायद्यांचे संक्षिप्त मूल्यमापन करेल.

१२. सुविधा संपन्न कुटुंब मिशन आवश्कता भासल्यास मिशन महासंचालक जिल्हा आणि तालुका स्तरावरील राबविलेल्या योजनांची तपासणी करतील.

१३. सुविधा संपन्न कुटुंब आणि सर्वांनी ग्राम समृद्धी यॊजनॆच्या अंमलबजावणीकरीता तसेच मनरेगाअंतर्गत केंद्र शासनाकडून मोठ्या प्रमाणात निधी उपलब्ध करून घेण्यासाठी मिशन महासंचालक, मनरेगा हे अंमलबजावणी करतील.

१४. मिशन महासंचालक दर्जा व मानधन :-
मिशन महासंचालक हे शासनाने नियुक्त केलेले, शासन किंवा शासन सेवेतून निवृत्त झालेले सचिव श्रेणीतील किंवा तत्सम अधिकारी असतील. शासन सेवेतून निवृत्त झालेल्या अधिका-यांची मिशन महासंचालक, मनरेगा पदी नियुक्ती केल्यास त्यांना सेवानिवृत्त अधिकाऱ्यांना नियुक्ती देण्यात येणारे नियामक मंडळे/ प्राधिकरणांचे अध्यक्ष/ मुख्य आयुक्तांना शासनाच्या विहित नियमानुसार अनुज्ञेय मानधन व निवास्थान अनुज्ञेय असेल.

१५. मिशनसाठीच्या खर्चाकरिता स्वतंत्र बँक खाते उघडण्यात येईल व सदर खात्यातून मिशनसाठीचा आस्थापना खर्च भागविण्याचे अधिकार महासंचालक व सहाय्यक संचालक (लेखा), मिशन कार्यालय किंवा रोहयो विभाग यांना संयुक्तपणे राहतील.

**IV. मिशन महासंचालक (मनरेगा) यांना सहाय्य करण्यासाठी खालीलप्रमाणे शासन स्तरावर नियोजन (रोहयो) विभागातील कार्यरत असलेले अधिकारी व कर्मचारी उपलब्ध असतील.**

१. उप सचिव (रोहयो)
२. राज्य गुणवत्ता नियंत्रक
३. उप/सहाय्यक संचालक (लेखा) (रोहयो)

मिशन महासंचालक मनरेगा यांच्या कार्यालयीन कामकाजासाठी खालील प्रमाणे कंत्राटी अधिकारी कर्मचारी उपलब्ध करून देण्यात येत आहेत.

१. उप अभियंता (सेवानिवृत्त) -२
२. राज्य MIS समन्वयक (कंत्राटी )-१
३. तांत्रिक अधिकारी (PTO) (कंत्राटी)-२
४. उच्च श्रेणी लघु लेखक (कंत्राटी)-१
५. क्लर्क कम डेटा एन्ट्री ऑपरेटर (CDEO) (कंत्राटी )-३
६. शिपाई (कंत्राटी )-३
७. वाहनचालक (कंत्राटी) - २

तसेच, क्षमता बांधणी कक्षासाठी आकृतीबंधात प्रस्तावित पदे मिशन कार्यालयासाठी उपलब्ध करण्यात येत आहेत.

वरील मिशन करीता नियमित पदांव्यातिरिक्त कामांची व्याप्ती लक्षात घेऊन काही पदे शासनाच्या मान्यतेने कंत्राटी पद्धतीने भरता येतील. यावर करण्यात येणारा खर्च किरकोळ असून सदर खर्च केंद्र शासनाकडून प्राप्त होणाऱ्या ६% प्रशासकीय खर्चातून व राज्य शासनाकडे उपलब्ध असलेल्या अन्य प्रशासकीय खर्चातून करण्यात येईल.

V. मनरेगाच्या माध्यमातून मिशनची प्रभाविपणे अंमलबजावणी करण्यासाठी मनरेगा अंतर्गत सर्व अधिकार मिशन महासंचालक, मनरेगा यांना देण्यात येत आहे यामध्ये सचिव (रोहयो) यांच्या सर्व जबाबदाऱ्या व अधिकार यांचाही समावेश राहील.

VI. सदरचा शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने व त्या विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र. १९६/ आपुक दि. १३ एप्रिल, २०२३ अन्वये निर्गमित करण्यात येत आहेत. वरील सर्व बाबींची तंतोतंत अंमलबजावणी करण्यात यावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०५०३१६२०३५४६१६ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने.

SANJANA PRADEEP KHOPDE

Digitally signed by SANJANA PRADEEP KHOPDE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PLANNING DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=162267a166279e51cd3f1cc6e10b61ce9868a859260375a1bba3e5f88931d998, pseudonym=2911D7031787EE13B33E937FE23AAB741D4241E4, serialNumber=5835A30DD240A2D86C82FB33FB5D7BCBF513D6EBBB4EFF8873D4E0AECC934DB5, cn=SANJANA PRADEEP KHOPDE
Date: 2023.05.09 12:20:21 +05'30'

**( संजना खोपडे )**
**उप सचिव (रोहयो), महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.मंत्री (रोहयो) यांचे खाजगी सचिव.
२. मा. अपर मुख्य सचिव (रोहयो), यांचे स्वीय सहायक .
३. सर्व विभागीय आयुक्त
४. आयुक्त, कृषी आयुक्तालय, पुणे.
५. आयुक्त, महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजना-महाराष्ट्र, नागपूर
६. सर्व जिल्हाधिकारी
७. सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद.
८. सर्व उपायुक्त (रोहयो), विभागीय आयुक्त कार्यालये.
९. संचालक (फलोत्पादन), कृषी आयुक्तालय, पुणे.
१०. संचालक (मृद संधारण), कृषी आयुक्तालय, पुणे.
११. मुख्य अभियंता (मृद व जलसंधारण) सर्व.
१२. सर्व जिल्हा अधीक्षक कृषी अधिकारी
१३. सर्व जिल्हा रेशीम अधिकारी.
१४. सर्व उपजिल्हाधिकारी (रोहयो)
१५. सर्व उप मुख्य कार्यकारी अधिकारी (नरेगा, ग्रामपंचायत)
१६. सर्व गटविकास अधिकारी, नरेगा
१७. उपवनसंरक्षक (सर्व)
१८. उपसंचालक, सामाजिक वनीकरण (सर्व)
१९. वित्त विभाग (अर्थ-१६ , व्यय-८)
२०. नियोजन विभाग (का.१४३४ व का.१४२४)
२१. निवड नस्ती, रोहयो - ७.